विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन) दोन
अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन निर्णय क्र.ईएसटी-२०२२/प्र.क्र.७/प्रशासन-१**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- ०२ मार्च, २०२२**

संदर्भ:- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०७/१६/आ.पु.क. दि.२७ जानेवारी, २०१७.
२) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. सअअ (मुं) / परिमंडळ/का-७/२०२२/१०१५, दि.०८ फेब्रुवारी, २०२२.

**प्रस्तावना :-**

महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र, नागपूर यांच्या कार्यालयात दोन विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन) यांची नव्याने नियुक्ती करण्यात आली आहे. सदर कर्मचाऱ्यांना वेतन व भत्ते अदा करण्यासाठी विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन) दोन पदे सेवार्थ प्रणालीमध्ये नव्याने समाविष्ट करण्याच्या अनुषंगाने दोन अधिसंख्य पदे परिविक्षाधीन कालावधीकरिता निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र, नागपूर कार्यालयाकडे नव्याने नियुक्त करण्यात आलेले प्रशिक्षणार्थी श्री.नितिन धनराज मेश्राम व श्री.सोमेश सोपान रेळेकर, विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन) [Central Civil Services (Revised Pay) Rules, २०१६ in the Level ६ (Six) in the Pay Matrix] यांना मासिक वेतन व भत्ते मिळण्यासाठी परिविक्षाधीन कालावधीकरिता दोन अधिसंख्य पदे निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. विभागीय लेखापाल या पदाची भरती प्रक्रिया स्टाफ सिलेक्शन कमिशनतर्फे करण्यात आली असून, सदर पदाचा परिविक्षाधीन कालावधी दोन वर्षांचा आहे. विभागीय लेखापाल (परिविक्षाधीन) या पदावर रुजू झालेल्या कर्मचाऱ्यांची सेवाविषयक माहिती पुढीलप्रमाणे आहे :-

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | शासन सेवेत रूजू झाल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाप्त होण्याचा दिनांक |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.नितिन धनराज मेश्राम | दि.१२/११/२०२१ | दि.११/११/२०२३ |
| २ | श्री.सोमेश सोपान रेळेकर | दि.१६/१२/२०२१ | दि.१५/१२/२०२३ |

वर नमूद कर्मचाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त झाल्याच्या दिनांकानंतरच्या दिनांकास सदर अधिसंख्य पदे आपोआप संपुष्टात येतील.

३. या बाबीवरील खर्च -मागणी क्र. एच-०६, २०५९ सार्वजनिक बांधकामे, ८० सर्वसाधारण , ००१-संचालन व प्रशासन (योजनेतर) (०८), कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई (०८) (०२) कार्यान्वयन (२०५९-१२४५)॰ या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०१६ /प्र.क्र.७/१६/आ.पु.क. दि.२७ जानेवारी, २०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३०२१२४६३८३६१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vikram Nivrutti Dhamal

Digitally signed by Vikram Nivrutti Dhamal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=23b2f1b1fd914a87080cb68712db5efd17f65e69284fe1d3274a32de69eb6a25, serialNumber=10d36944a4b86eab516b1b70183709c5fb570cfdf5a52755adfef51ed380b836, cn=Vikram Nivrutti Dhamal
Date: 2022.03.02 12:49:20 +05'30'

**( वि.नि.ढमाळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. अपर मुख्य सचिव (सा.बां), सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
२. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई.
८. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई.
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
११. जिल्हा कोषागार / उपकोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१२. वित्त विभाग (कार्यासन व्यय-११/ आकृतीबंध पुनर्रचना कक्ष), मंत्रालय, मुंबई-३२.
१३. कार्यासन सेवा-४/अर्थसंकल्प-३, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४. कार्यासन प्रशासन-१, सार्वजनिक बांधकाम विभाग, (निवडनस्ती)